**राज्य पोलीस दलास *“Artificial Intelligence”* चा वापर करुन कायदा अंमलबजावणीचे कार्य अधिक प्रभावीपणे करता यावे म्हणून *“MARVEL”* नामक *“Special Purpose Vehicle (SPV)”* स्थापन करण्यास मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०८२३/प्र.क्र.१३०/पोल-३.**

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.

दिनांक : १६ मार्च २०२४.

<u>वाचा</u> :- शासन निर्णय, गृह विभाग, क्र. संकीर्ण-०८२३/प्र.क्र.१३०/पोल-३, दिनांक १६.०२.२०२४.

**<u>प्रस्तावना.</u>**

राज्य पोलीस दलास *“Artificial Intelligence”* चा वापर करुन कायदा अंमलबजावणीचे कार्य अधिक प्रभावीपणे करता यावे म्हणून *“Maharashtra Advanced Research and Vigilance for Enhanced Law Enforcement (MARVEL)”* नामक *“Special Purpose Vehicle (SPV)”* स्थापन करण्यास शासन निर्णय, गृह विभाग, क्र.संकीर्ण-०८२३/प्र.क्र.१३०/पोल-३, दिनांक १६.०२.२०२४, द्वारे, पुढील अटींवर, तत्त्वत: मान्यता देण्यात आली आहे:-

१) उक्त “SPV” स्थापन करण्याच्या प्रयोजनासाठी राज्य शासन, भारतीय व्यवस्थापन संस्था, नागपूर (I.I.M., Nagpur), आणि मे. पिनाका टेक्नोलॉजीज खाजगी मर्या. या तीन पक्षांमध्ये करार करण्यात यावा.

२) उक्त “SPV” हे १०० टक्के शासनाचे भाग भांडवल असलेली, शासन मालकीची, *“Maharashtra Advanced Research and Vigilance for Enhanced Law Enforcement (MARVEL)”* या नावाने खाजगी मर्यादित कंपनी म्हणून नोंदणीकृत करण्यात येईल.

३) पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण), हे उक्त कंपनीचे पदसिद्ध संचालक व मुख्य कार्यकारी अधिकारी असतील आणि ते थेट शासनाच्या (गृह विभागाच्या) अधिपत्याखाली काम करतील.

४) संचालक, भारतीय व्यवस्थापन संस्था, नागपूर (I.I.M., Nagpur), हे उक्त कंपनीचे पदसिद्ध संचालक असतील आणि कंपनीचे इतर संचालक हे शासन नामनिर्देशित करेल.

**<u>शासन निर्णय</u>.**

राज्य पोलीस दलास *“Artificial Intelligence”* चा वापर करुन कायदा अंमलबजावणीचे कार्य अधिक प्रभावीपणे करता यावे म्हणून *“Maharashtra Advanced Research and Vigilance for Enhanced Law Enforcement (MARVEL)”* नामक *“Special Purpose Vehicle (SPV)”* स्थापन करण्यास, शासन निर्णय, गृह विभाग, क्र.संकीर्ण-०८२३/प्र.क्र.१३०/पोल-३, दिनांक १६.०२.२०२४, यामध्ये निर्दिष्ट अटींवर, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच, उक्त “SPV” स्थापन करण्याच्या प्रयोजनासाठी राज्य शासन, भारतीय व्यवस्थापन संस्था, नागपूर (I.I.M., Nagpur), व मे. पिनाका टेक्नोलॉजीज खाजगी मर्या. या तीन पक्षांमध्ये करार करण्यास, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे.

३. उक्त “SPV” च्या स्थापनेपासून प्रथम पाच वर्ष उक्त कंपनीस खर्च भागविण्यासाठी एकूण रु.२३,३०,५०,०००/- (रुपये तेवीस कोटी, तीस लक्ष, पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम भाग भांडवल स्वरुपात देण्यात येईल.

४. उक्त खर्च हा गृह विभाग, मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस, ००,११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण, (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प, (०१)(०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (कार्यक्रम), ५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री (२०५५ए०३२), या लेखाशीर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने *(मंत्रिमंडळ बैठक, दिनांक १६.०३.२०२४)* निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१६१५४११०४७२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.03.16 15:50:37 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) संचालक, भारतीय व्यवस्थपान संस्था, नागपूर.
७) पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण).
८) मे. पिनाका टेक्नोलॉजीज खाजगी मर्या. *[पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रा.) यांच्या मार्फत]*

**प्रत-**

१) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

२) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

३) कार्यासन अधिकारी (व्यय-७/सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) निवड नस्ती, पोल-३.